STORY OF MY LIFE




**वाचन पातळी १**

# माझी गोष्ट

**Author:** MARGARET OMOQUI
**Illustrators:** 211 Studio, Angelika Heuer, Aniyah Washington, Paper Boat Drinks, Priya Kuriyan
**Translator:** Manasee Mahajan




माझं आयुष्य खूप खडतर आहे. मला स्वमग्नता (ऑटिसम) आहे आणि प्रेडर विली सिन्ड्रोम (एक आनुवंशिक विकार) आहे. मला सारखी भूक लागते. घास गिळताना त्रास होतो. माझी झोप पूर्ण झाली नाही तर शाळेत सुद्धा मला त्रास होतो. शाळेत पूर्ण दिवस थांबणे फार अवघड होते. ती शाळा माझ्यासाठी योग्य नव्हती. माझ्या वर्गातली एक मुलगी सारखी किंचाळायची म्हणून मला त्रास व्हायचा, पूर्ण दिवस वाईट जायचा. पुढच्या वर्षी मात्र मी शाळेत गेले तेव्हा त्यांनी त्या मुलीला दुसऱ्या वर्गात बसवले. माझा दिवस वाईटच जात होता, पण मला मदतीसाठी एक ताई मिळाली. मला बरे वाटले. खूप मदत झाली. तरीही मला त्रास होत असे. त्यांनी माझा वर्ग बदलला.




माझे शिक्षक मला खूप मदत करतात. मी उदास झाले की माझ्याशी बोलतात. काय घडले हे सांगण्यासाठी ते मला मदत करतात . मी उदास झाले की थोडा वेळ काहीच करत नाही. माझ्या मित्रांबरोबर आणि शिक्षकांबरोबर खेळायला मला आवडते. कोणी माझ्या भावना दुखावल्या तर मला मदत लागतेच, कारण मग मी खूप अस्वस्थ होते. खूप वेड्यासारखी वागते, चिडते. मग मला सुरक्षित जागेवर न्यावे लागते. मी थोडा वेळ तिथे भिंतीला पाठ टेकवून बसून राहते.




शांत झाले की मी बाहेर येते आणि दुसऱ्या खोलीत जाऊन बसते. मग ते माझ्यासाठी काही काम घेऊन येतात. काम झाल्यावर मी पुन्हा वर्गात जाऊन बसते.



माझे शिक्षक वर्तणूक (बेहेविअर) तज्ञ आहेत. मला ब्रेक हवा असला की ते मला मदत करतात, मला चालायला घेऊन जातात. माझ्याशी शाळेत खूप चांगले वागतात. मला शिकण्यासाठी मदत करतात. मला माझ्या आधीच्या शाळेत परत जायचे आहे, म्हणजे मला माझे मित्र भेटतील.



अशी आहे माझ्या आयुष्याची गोष्ट. माझ्या जागी तुम्ही असता, तर तुमचे आयुष्य बदलण्यासाठी तुम्ही काय केले असते?

## Story Attribution:

This story: माझी गोष्ट is translated by Manasee Mahajan . The © for this translation lies with Manasee Mahajan, 2020. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Based on Original story: 'my story', by MARGARET OMOQUI . © MARGARET OMOQUI , 2017. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

## Images Attributions:

Cover page: story of my life, by Aniyah Washington © Aniyah Washington, 2020. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 2: School bags sitting in the class room sadly while the students have fun outside, by 211 Studio © Pratham Books, 2017. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 3: Staff Room, by Paper Boat Drinks © StoryWeaver, Pratham Books, 2017. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 4: Staff Room, by Paper Boat Drinks © StoryWeaver, Pratham Books, 2017. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 5: Basteln, by Angelika Heuer © Angelika Heuer, 2020. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 6: Girl sitting on grandmother's lap and reading while a black cat sleeps, by Priya Kuriyan © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

# माझी गोष्ट

(Marathi)

माझ्याबद्दल काही

या पुस्तकाची वाचन पातळी १ आहे. टप्प्याटप्प्यानं वाचणाऱ्या मुलांसाठी.

